**मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पूरपुनर्वसित गावठाणातील नागरी सुविधा कामांना कार्योत्तर मंजूरी देणेबाबत...**

महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आव्यप्र-२०१८/प्र.क्र.४०/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: २१/०८/२०१८

वाचा -

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरपीअे-१०९१/१७८६/प्र.क्र.२५२/र-१, दि.४.१२.१९९१

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरपीए-२००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आव्यप्र-२०११/प्र.क्र.९७/आव्यप्र-२, दि.२.९.२०१४

४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे कार्यालयीन आदेश क्र.उपआ/ भूस२/ पुनर्व/ कावि/९७७/ २०१६, दि.६.४.२०१६

५) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्र.कक्ष २७/अ.का./पुर-पुनर्व/कावि/ १४६०/२०१८, दि.२४.५.२०१८

प्रस्तावना -

संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय दि.२.९.२०१४ अन्वये अमरावती जिल्ह्यातील सन २००७ मधील अतिवृष्टीने/ पुरामुळे बाधित झालेल्या गावांचे पुनर्वसन/ घरांची पुनर्बांधणी करण्याबाबत शासन मान्यता प्रदान करण्यात आली. सदर शासन निर्णयानुसार मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या या गावाचे पुनर्वसन करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात आली. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.४.१२.१९९१ नुसार पुनर्वसित किंवा पुनर्वसनासाठी निर्माण केलेल्या गावठाणात नागरी सुविधा पुनविण्याच्यासंदर्भात वैयक्तिक कामांना रुपये १०.०० लाखापर्यंत प्रशासकीय मंजूरी देण्याचे अधिकार विभागीय आयुक्तांना प्रदान करण्यात आले आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.१.८.२००९ अन्वये पुनर्वसित/ विस्तारित गावठाणामध्ये नागरी सुविधा पुरविण्यासाठी मानके निश्चित करण्यात आले आहे. संदर्भ क्र.४ नुसार, विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या दि.६.४.२०१६ रोजी कार्यालयीन आदेशान्वये, मौजा आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पुरपुनर्वसित गावठाणामध्ये सिमेंट कॉंक्रीट नालीचे बांधकाम (१ काम) व सिमेंट कॉंक्रीट रस्त्याचे बांधकाम (२ कामे) अशा एकूण ३ कामांना रुपये २४,५४,३४०/- रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामे पूर्ण करण्यात आली असून, कामांची देयके अदा करण्यासाठी जिल्हाधिकारी, अमरावती यांनी संदर्भ क्र.५ येथील दि.२४.५.२०१८ अन्वये निधी मागणी करण्यात आली आहे.

२. शासन निर्णय दि.१.८.२००९ अन्वये, पुनर्वसित/ विस्तारीत गावामध्ये अंतर्गत रस्ते हे खडीचे रस्ते देण्याची तरतूद आहे. परंतू, विभागीय आयुक्त, अमरावती यांनी मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती येथे सिमेंट कॉंक्रीट रस्त्याचे बांधकामांना प्रशासकीय मान्यता दिली आहे. कॉंक्रीट रस्त्याच्या बांधकामांना कार्योत्तर मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

**मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पुनर्वसित गावठाणामधील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद प्रशासकीय मान्यता प्राप्त सिमेंट काँक्रीट रस्त्याच्या २ कामांना एकूण रू.१९,५४,३४०/- (अक्षरी रूपये एकोणवीस लक्ष चौपन्न हजार तीनशे चाळीस फक्त) रकमेस विशेष बाब म्हणून कार्योत्तर मंजूरी प्रदान करण्यात येत आहे. पूर्वोदाहरण म्हणून याआधारे अन्य प्रकरणात मागणी करता येणार नाही.**

२. सदर कामांवरील खर्च "मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून करण्यात यावा. निधी वितरणाचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२११८१३५२१५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rahul Vijay Kulkarni

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, cn=Rahul Vijay Kulkarni
Date: 2018.08.21 18:14:52 +05'30'

(राहुल विजय कुलकर्णी)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) अमरावती विभाग, अमरावती.
२. उप आयुक्त (पुनर्वसन), अमरावती.
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अमरावती.
४. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अचलपूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. महसूल व वन विभाग, कार्यासन ब-१/पी.ए.सी.,मंत्रालय, मुंबई ३२.
११. निवडनस्ती कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: आव्यप्र-२०१८/प्र.क्र.४०/र-१२, दि. २१ /०८/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पुनर्वसित गावठाणांमधील प्रशासकीय मान्यता प्राप्त एकूण ०२ नागरी सुविधा कार्योत्तर मंजूर कामांचा तपशील**

| अ.क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १ | आखातवाडा | सिमेंट काँक्रीट रस्त्याचे बांधकाम भाग-१ | ९,८१,६८०/- |
| २ | आखातवाडा | सिमेंट काँक्रीट रस्त्याचे बांधकाम भाग-२ | ९,७२,६६०/- |
| | | **एकूण** | **१९,५४,३४०/-** |

Rahul Vijay Kulkarni

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, cn=Rahul Vijay Kulkarni
Date: 2018.08.21 18:15:22 +05'30'

( राहुल विजय कुलकर्णी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

******